उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर यांच्या अधिपत्याखालील कारंजा, देवरी व हिंगणघाट या ३ ट्रामा केअर युनिट येथील ३० अस्थाई पदे पुढे चालू ठेवण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः पदआ २०१८/ प्र.क्र. १३५ / आरोग्य-३

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: १६ ऑक्टोबर, २०१८

वाचा -

१) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक-पदआ-२०१८/प्र.क्र.१३५/आरोग्य-३, दिनांक- ०४.०५.२०१८.
२) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक-संआसे/कक्ष-३/टे-५अ/ट्राकेयु ग्रा, उपरु/अपदे/३८५०-५१/१८, दिनांक- २७.०४.२०१८.

## शासन निर्णय-

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. १ येथील शासन निर्णयान्वये ग्रामिण रुग्णालय, कारंजा, जि.वर्धा, ग्रामिण रुग्णालय, देवरी, जि.गोंदिया व उपजिल्हा रुग्णालय, हिंगणघाट, जि.वर्धा येथील ट्रामा केअर युनिट अंतर्गत प्रत्येकी १० अस्थाई पदे याप्रमाणे ३० अस्थाई पदांना दि.०१.०३.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये ग्रामिण रुग्णालय, कारंजा, जि.वर्धा, ग्रामिण रुग्णालय, देवरी, जि.गोंदिया व उपजिल्हा रुग्णालय, हिंगणघाट, जि.वर्धा येथील ट्रामा केअर युनिट अंतर्गत सदर ३० अस्थाई पदांना दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१८-२०१९ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक-आर-१

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०३ - ग्रामिण आरोग्य सेवा व विषम चिकित्सा
११० - रुग्णालये व दवाखाने
११० -१ - इतर रुग्णालये व दवाखाने
(०१)(०१) - कुटीर रुग्णालये (२२१० ०३१५)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आपुक,दि. - ०७.०९.२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१५१८०१२८६८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2018.10.16 13:19:51 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्यसेवा, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा(रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा(अर्थ व प्रशासन) मुंबई.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, वर्धा/ गोंदिया..
८. जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा/ गोंदिया.
९. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामिण रुग्णालये, (उपसंचालक, आरोग्यसेवा, नागपूर यांचेमार्फत)
१०.वित्त विभाग,(व्यय-१३) मंत्रालय,मुंबई.
११.कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प,सा.आ.वि.मंत्रालय,मुंबई.
१२.निवडनस्ती (आरोग्य-३)